महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेत नसलेली गट-क व गट-ब (अराजपत्रित) पदे सरळसेवेने भरताना उमेदवारांकडून ऑनलाईन पद्धतीने अर्ज स्विकारणे व स्पर्धा परीक्षा आवेदन शुल्क सुधारीत करणेबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः प्रानिमं:१२१४/२८९/(प्र.क्र.१०८/१४)/१३-अ**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
**दिनांक: ११ मार्च, २०१५**

संदर्भ:-

१) **शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः प्रानिमं २००७/प्र.क्र.४६/०७/१३-अ, दिनांक १९ ऑक्टोबर, २००७.**
२) **शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः प्रानिमं २००७/प्र.क्र.४६/०७/१३-अ, दिनांक २७ जून, २००८.**
३) **शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः प्रानिमं १२१४/प्र.क्र.(४३/१४)/१३-अ, दिनांक ५ जून, २०१४.**
४) **प्रधान सचिव, सामान्य प्रशासन विभाग (माहिती तंत्रज्ञान), मंत्रालय, मुंबई यांचे क्रमांक: GAD-मातंसं/३१/२०१४-O/O, दिनांक २ डिसेंबर, २०१४ चे पत्र.**

प्रस्तावना :-

संदर्भ क्र. १ व २ येथील शासन निर्णयान्वये, महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेत नसलेली गट-क व गट-ब (अराजपत्रित) मधील रिक्त पदांवर सरळसेवेने निवड करण्याकरिता जिल्हाधिकाऱ्यांच्या अध्यक्षतेखाली जिल्हास्तरीय निवड समित्या, प्रादेशिक विभाग प्रमुखांच्या स्तरावर प्रादेशिकस्तरीय निवड समित्या तसेच विभाग प्रमुखांच्या स्तरावर राज्यस्तरीय निवड समित्या स्थापन करण्यात आल्या आहेत. सदर निवड समित्यांकडून, प्रचलित नियम व विहित कार्यपद्धतीनुसार गट-क व गट-ब (अराजपत्रित) उमेदवारांची सरळसेवेने निवड करण्याकरिता लेखी परीक्षा घेऊन पात्र उमेदवारांची प्रवर्गनिहाय निवडसूची तयार करण्यात येते. रिक्त पदे भरतांना वृत्तपत्रीय जाहिरातीबरोबरच भरती करावयाच्या रिक्त पदांबाबतची माहिती पदसंख्येसह संबंधित रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्रासह, रोजगार व स्वयंरोजगार संचालनालयास देऊन सदर पदांच्या भरतीबाबतची जाहिरात रोजगार व स्वयंरोजगार विभागाच्या संकेतस्थळावरही प्रसिध्द करण्याबाबतच्या सूचना वरील शासन निर्णयान्वये निवड समित्यांना देण्यात आल्या आहेत. त्याचबरोबर उक्त संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये, स्पर्धा परीक्षेकरिता खुल्या प्रवर्गाच्या उमेदवारांकडून रु.१५०/- व राखीव प्रवर्गाच्या उमेदवारांकडून रु.७५/- एवढे परीक्षा शुल्क विहित करण्यात आलेले आहे. तसेच संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णय, दि. ५/०६/२०१४ अन्वये, महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेत नसलेली गट-क व गट-ब (अराजपत्रित) मधील रिक्त पदांवर सरळसेवेने निवड करतांना उमेदवारांची मौखिक परीक्षा (मुलाखती) न घेण्याच्या सूचना देण्यात आलेल्या आहेत.

सन २०१५ हे वर्ष "संगणकीय कालमर्यादित सेवा वर्ष" (Year of Digitised and Time-Bound Services) म्हणून घोषित करण्यात आले असून या वर्षापासून शासकीय कार्यालयांनी जनतेस इलेक्ट्रॉनिक माध्यमांतून सेवा उपलब्ध करावयाच्या आहेत. त्यानुसार महाराष्ट्रातील विविध पदांसाठी उमेदवारांची सरळसेवेने निवड करण्याकरिता भरती प्रक्रियेत पारदर्शकता व सुलभता आणण्याच्या दृष्टीने उमेदवारांकडून ऑनलाईन पद्धतीने अर्ज स्विकारुन संगणक/नेटवर्कच्या माध्यमातून अशा अर्जांवर कार्यवाही करण्याच्या सूचना संदर्भ क्र.४ येथील पत्रान्वये देण्यात आल्या आहेत. सदर सुचनांच्या अनुषंगाने, भूतपूर्व दुय्यम सेवा निवड मंडळाच्या कक्षेतील गट-क व गट-ब (अराजपत्रित) मधील सरळसेवा भरती प्रक्रियेमध्ये ऑनलाईन पध्दती कार्यान्वित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेत नसलेली भूतपूर्व दुय्यम सेवा निवड मंडळाच्या कक्षेतील गट-क व गट-ब (अराजपत्रित) मधील सरळसेवेची पदे भरण्याकरिता आयोजित केल्या जाणाऱ्या स्पर्धा परीक्षांसंदर्भात शासन असे निदेश देत आहे की, संबंधित जिल्हा निवड समित्या, प्रादेशिकस्तरीय निवड समित्या तसेच राज्यस्तरीय निवड समित्यांनी सन २०१५ पासून संगणक प्रणालीचा वापर करुन स्पर्धा परीक्षांचे अर्ज व परीक्षा शुल्क ऑनलाईन पद्धतीने स्विकारणे, ते तपासणे, त्यावर योग्य ती प्रक्रिया करुन परीक्षेचे ऑनलाईन प्रवेश पत्र तयार करणे, परीक्षेचा निकाल तसेच शिफारस झालेल्या/ न झालेल्या उमेदवारांच्या याद्या संकेतस्थळावर जाहीर करणे इत्यादि कामे ऑनलाईन पध्दतीने पार पाडावीत. तसेच ऑनलाईन पध्दतीने पार पाडावयाच्या कार्यपध्दतीची माहिती इच्छूक उमेदवारांना व्हावी याकरिता, त्याबाबत निवड समित्यांनी वृत्तपत्रीय जाहिरातींद्वारे तसेच रोजगार व स्वयंरोजगार संचालनालयाच्या संकेतस्थळावर तसेच स्थानिक रोजगार व्यवसाय मार्गदर्शन केंद्रांमार्फत व्यापक पूर्वप्रसिद्धी दयावी.

२. मे. महाऑनलाईन लिमिटेड हा महाराष्ट्र शासन व टाटा कन्सल्टन्सी लि. यांचा संयुक्त उपक्रम असून या कंपनीने महाराष्ट्र शासनाच्या विविध विभागांतील पदांच्या भरतीकरिता ऑनलाईन अर्ज मागविणे व तत्सम कामांकरिता संगणक प्रणाली विकसित केली आहे. या प्रणालीचा वापर महाराष्ट्र लोकसेवा आयोगाद्वारे तसेच राज्यातील पोलिस भरतीकरिता करण्यात येत आहे. ही बाब विचारात घेऊन असे सूचित करण्यात येते की, महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेत नसलेली भूतपूर्व दुय्यम सेवा निवड मंडळाच्या कक्षेतील गट-क व गट-ब (अराजपत्रित) मधील पदांच्या सरळसेवा भरती प्रक्रियेंतर्गत स्पर्धा परीक्षांचे अर्ज व परीक्षा शुल्क ऑनलाईन पद्धतीने स्विकारणे, ते तपासणे, त्यावर योग्य ती प्रक्रिया करुन परीक्षेचे ऑनलाईन प्रवेश पत्र तयार करणे, परीक्षेचा निकाल, तसेच शिफारस झालेल्या/ न झालेल्या उमेदवारांच्या याद्या संकेतस्थळावर जाहीर करणे इत्यादि कामांसाठी जिल्हा निवड समित्या, प्रादेशिकस्तरीय निवड समित्या तसेच राज्यस्तरीय निवड समित्यांना मे.महाऑनलाईन लिमिटेड या कंपनीच्या ऑनलाईन/संगणक प्रणालीचा वापर करता येऊ शकेल.

३. वरील कामाप्रीत्यर्थ मे.महाऑनलाईन लिमिटेड या कंपनीस प्रति उमेदवार ₹ १५/- व जिल्हा सेतू संस्था यांना ₹५/- असे एकूण ₹२०/- एवढे सेवाशुल्काचे दर सदर कंपनीकडून शासनास प्राप्त

झालेल्या दि. ११/२/२०१५ च्या पत्रामध्ये नमूद करण्यात आले आहेत. तथापि, निवड समित्यांना आवश्यकतेनुसार, मुख्य परिचलन अधिकारी, मे. महाऑनलाईन लिमिटेड यांच्याशी संपर्क साधून त्यांचेशी योग्य तो करारनामा/सामंजस्य करार (Memorandum of Understanding) करता येईल. मे.महाऑनलाईन लिमिटेड यांचा पत्रव्यवहाराचा पत्ता पुढीलप्रमाणे आहे:-

**मुख्य परिचलन अधिकारी, मे. महाऑनलाईन लिमिटेड,**

**१० वा मजला, गोदरेज कोलिजियम, सोमय्या हॉस्पिटल मार्गाजवळ, शीव (पूर्व),मुंबई- ४०० ०२२**

**दूरध्वनी क्रमांक:- ०२२-६७०७ ७०००** **फॅक्स क्रमांक:- ०२२-२४०२ ०५०७**

**संकेतस्थळ:-** http://www.mahaonline.gov.in

४. वरील कार्यपद्धतीनुसार केल्या जाणाऱ्या कार्यवाहीसंबंधात काही आक्षेप उद्भवल्यास, त्याचे निराकरण करण्याची जबाबदारी, जी कार्यवाही महाऑनलाईनच्या अखत्यारित येत असेल त्याबाबतीत महाऑनलाईनची आणि जी कार्यवाही संबंधित जिल्हास्तरीय निवड समिती/ प्रादेशिकस्तरीय निवड समिती/ राज्यस्तरीय निवड समितीच्या अखत्यारित येत असेल त्याबाबतीत संबंधित निवड समितीची असेल.

५. वरील परिच्छेद १ येथे निदेशित केल्याप्रमाणे ऑनलाईन पध्दतीने अर्ज मागवून त्यावर संगणक प्रणालीद्वारे करण्यात येणाऱ्या प्रक्रियेच्या कामाकरिता होणाऱ्या खर्चासाठी विभागप्रमुख/ प्रादेशिक विभागप्रमुख/ जिल्हाधिकारी यांनी त्यांच्या कार्यालयीन अंदाजपत्रकात आवश्यक ती वाढीव तरतूद करावी व मंजूर अनुदानातून सदर खर्च भागविण्यात यावा.

६. राज्यातील सर्व स्थानिक स्वराज्य संस्थांमधील तसेच विविध प्रशासकीय विभागांच्या नियंत्रणाखालील महामंडळांमधील गट-क व गट-ब (अराजपत्रित) पदांच्या सरळसेवा भरतीची प्रक्रिया देखील ऑनलाईन पध्दतीने उपरोक्त निदेशांनुसार पार पाडावी.

७. शासनाच्या उपरोक्त निदेशांची अंमलबजावणी व संनियंत्रण करण्याची जबाबदारी सर्व संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागांची राहील.

८. संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये, स्पर्धा परीक्षेकरिता खुल्या प्रवर्गाच्या उमेदवारांकडून ₹ १५०/- व राखीव प्रवर्गाच्या उमेदवारांकडून ₹ ७५/- एवढे परीक्षा शुल्काचे दर विहित करण्यात आले असून ते सन २००७ पासून लागू आहे. स्पर्धा परीक्षेच्या आयोजनाकरिता येणारा वाढीव खर्च विचारात घेता सदर परीक्षा शुल्क दर परीक्षा प्रक्रीयेसाठी पुरेसे नसल्यामुळे ते पुढीलप्रमाणे सुधारीत करण्यात येत आहेत:-

| **खुला प्रवर्ग** | **राखीव प्रवर्ग** |
|---|---|
| **₹ ३००/-** | **₹ १५०/-** |

९. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१५०३११११५४९४१६४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhagwan Sahai

Digitally signed by Bhagwan Sahai
DN: c=IN, o=All India Service, ou=IAS, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Bhagwan Sahai
Date: 2015.03.11 16:02:37 +05'30'

**( डॉ.भगवान सहाय )**
अपर मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,
२. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
४. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद / विधानसभा, विधानभवन, मुंबई,
५. सर्व संसद सदस्य, विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य,
६. मुख्य सचिव,
७. सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
८. सर्व मंत्रालयीन विभाग (आस्थापना), त्यांनी हे आदेश सर्व संबंधितांच्या निदर्शनास आणावेत.
९. *प्रबंधक, मूळ शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
१०. *प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
११. *प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
१२. *प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई
१३. *सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
१४. *सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानसभा) मुंबई,
१५. *सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधान परिषद) मुंबई,
१६. *राज्य निवडणूक आयुक्त, राज्य निवडणूक आयोग, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई.
१७. *सचिव, राज्य माहिती आयोग, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई,
१८. *महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई,
१९. *महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र, मुंबई,
२०. *महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, नागपूर,
२१. *महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र, नागपूर,
२२. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,मुंबई (प्रसिध्दीकरिता ५ प्रती)

२३. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथालय, ६वा मजला, विधान भवन, मुंबई ४०० ०३२ (१० प्रती)
२४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
२५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
२६. मुख्य लेखापरीक्षक (निवासी लेखे), कोंकण भवन, नवी मुंबई,
२७. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथालय, ६ वा मजला, विधान भवन, मुंबई ३२ (१० प्रती)
२८. संचालक, रोजगार, स्वयंरोजगार व कौशल्य विकास संचालनालय, कोकण भवन , सीबीडी बेलापूर, नवी मुंबई- ४०० ६१४
२९. सर्व विभागीय आयुक्त,
३०. सर्व जिल्हाधिकारी,
३१. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
३२. मुख्य परिचलन अधिकारी, मे. महाऑनलाईन लिमिटेड ,१० वा मजला, गोदरेज कोलिजियम, सोमय्या हॉस्पिटल मार्गाजवळ, शीव (पूर्व),मुंबई-४०० ०२२
३३. बहुजन समाज पार्टी, डी-१ इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई -१ (५ प्रती)
३४. भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ. बॅरॅक नं.१ योगक्षेम समोर, वसंतराव भागवत चौक, नरीमन पॉईंट, मुंबई -२० (५ प्रती)
३५. भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभुवन, एस. व्ही.पटेल रोड, मुंबई- ४ (५ प्रती)
३६. भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई- १३ (५ प्रती)
३७. इंडियन नॅशनल कॉंग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई- २५ (५ प्रती)
३८. नॅशनलिस्ट कॉंग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरीमन पॉईंट, मुंबई -२१ (५ प्रती)
३९. शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई- २८ (५ प्रती)
४०. सर्व मंत्रालयीन विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व विभागप्रमुख/ प्रादेशिक विभाग प्रमुख/ कार्यालय प्रमुख (मंत्रालयीन विभागांमार्फत)
४१. मंत्रालय मध्यवर्ती ग्रंथालय, मंत्रालय, मुंबई (२ प्रती)
४२. सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,

*पत्राने